**शासनाकरीता नक्षलविरोधी अभियानाकरीता खरेदी करण्यात येणा-या H १४५ या नवीन हेलिकॉप्टरच्या प्रशिक्षणाकरीता विमानचालन संचालनालयातील तीन वैमानिकांना पाठविणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्र. विचासं-१११८/१/ प्र.क्र.८०/२८-अ,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई ३२.

दिनांक: २९ ऑक्टोबर, २०२१.

<u>वाचा</u>: १) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११८/प्र.क्र.३५/२८-अ, दि.२३ एप्रिल,२०१८ अन्वये निर्गमित करण्यात आलेले मा.शक्ती प्रदत्त समितीच्या दि.६.०४.२०१८ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय समक्रमांकित, दिनांक ८/५/२०१८

३) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय समक्रमांकित दिनांक १५/०४/२०१९

४) विमानचालन संचालनालयाचे पत्र क्र.डीए/एडीएम/४३४/२०२१, दि.२/४/२०१९.

५) विमानचालन संचालनालयाचे दिनांक २४/६/२०२१ व २८/६/२०२१ चे पत्र व सहपत्र

६) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय समक्रमांकित दिनांक २/०७/२०२१

७) विमानचालन संचालनालयाचे दिनांक ६/९/२०२१ चे पत्र व सहपत्र

**<u>प्रस्तावना</u>**

संदर्भ क्र.६ च्या शासन निर्णयान्वये एअरबस कंपनीकडून शासकीय वैमानिकांना DGCA/ EASA मान्यताप्राप्त प्रशिक्षण देण्यात येणार होते. त्यानुसार विमानचालन संचालनालयातील वैमानिकांना दुस-या उजळणी प्रशिक्षणासाठी परदेशी पाठविण्याबाबत मान्यता देण्यात आली होती. परंतु सदर प्रशिक्षणाच्या कालावधी दि.८/७/२०२१ ते १६/७/२०२१ ऐवजी दि.७/९/२०२१ ते १७/९/२०२१ असा बदल झाला असून तिन्ही वैमानिकांचे प्रशिक्षणासाठी प्रस्थान झालेले असल्याने दिनांक २/७/२०२१ चा शासन निर्णय रद्द करुन कार्योत्तर मंजूरी देऊन नव्याने शासन निर्णय निर्गमित करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

एअरबस कंपनीकडून शासकीय वैमानिकांना DGCA/EASA मान्यताप्राप्त प्रशिक्षण देण्यात येणार आहे. त्यानुसार विमानचालन संचालनालयातील खालील तीन वैमानिकांना त्यांच्या नावापुढे नमूद केलेल्या कालावधीमध्ये दुस-या उजळणी प्रशिक्षणासाठी परदेशी जाण्यासाठी व त्याअनुषंगाने होणा-या खर्चास तसेच दिनांक ५/९/२०२१ रोजी मुख्यालय सोडण्यास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **वैमानिकाचे नाव व पदनाम** | **प्रशिक्षणाचा दिनांक** | **प्रशिक्षणाचा एकुण कालावधी** | **प्रशिक्षणाचे ठिकाण** |
|---|---|---|---|---|
| १ | कॅ.संजय कर्वे, मुख्य वैमानिक | दि.०७.०९.२०२१ ते १७.०९.२०२१ | १५ दिवस | डल्लास (अमेरीका) |
| २ | कॅ.महेंद्र दळवी, वरिष्ठ वैमानिक | दि.०७.०९.२०२१ ते १७.०९.२०२१ | १५ दिवस | डल्लास (अमेरीका) |
| ३ | कॅ.मोहित शर्मा वैमानिक | दि.०७.०९.२०२१ ते १७.०९.२०२१ | १५ दिवस | डल्लास (अमेरीका) |

३. सदर प्रशिक्षणासाठी एकुण तीन वैमानिकांचा अमेरीका येथील प्रवास खर्च, निवास खर्च, दैनिक भत्ता, प्रवास खर्च (विमान), प्रवास विमा व इतर कर असा एकूण रु.२६,३२,००८/- एवढा खर्च येणार आहे. हा खालील लेखाशीर्षाखालील सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याच उपलेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र ए-४,
"२०७०-इतर प्रशासनिक सेवा
(००) (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण
(००) (०२) विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन
(२०७० ०१५६) ११-प्रवास खर्च

४. या प्रित्यर्थ उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून व संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२१११०११०३४१७१९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mahesh Kisan Wavhal

Digitally signed by Mahesh Kisan Wavhal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, serialNumber=495c75b4c173c81f308bd63a1b33a5da4ea131ed182d44ea1b502ab4662e9810, cn=Mahesh Kisan Wavhal
Date: 2021.11.01 10:35:37 +05'30'

**( म.कि.वाव्हळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीसाठी सादर,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
३. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
४. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५. महालेखापाल, ( लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. सामान्य प्रशासन विभाग /कार्या.२५, मंत्रालय, मुंबई ३२.
९. निवड नस्ती.

## शासन निर्णय क्र.विचासं १११८/प्र.क्र.८०/२८-अ, दि. २९.१०.२०२१ सोबतचे सहपत्र

## परिशिष्ट-१

| अ. क्र. | खर्चाची बाब | प्रति वैमानिक खर्च | तीन वैमानिकांच्या प्रशिक्षणाकरीता येणारा एकुण खर्च |
|---|---|---|---|
| १. | वैमानिकांचा प्रवास खर्च व प्रवास विमा | ३,५०,००० + १५,००० = ३,६५,०००/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो) | रु. १०,९५,०००/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च<br>(जो कमी असेल तो) |
| २. | प्रशिक्षणाचा कालावधी | ११ दिवस (प्रशिक्षणपूर्व २ दिवस + प्रत्यक्ष प्रशिक्षण दि.०७.०९.२०२१ ते १५.०९.२०२१ ) | -- |
| ३. | टी.एस.ए. फिंगर प्रिंटीगचा कालावधी | ०४ दिवस (दि.१६.०९.२०२१ ते १९.०९.२०२१) | -- |
| ४. | एकुण प्रशिक्षणाचा कालावधी | १५ दिवस ( प्रशिक्षणपूर्व २ दिवस + दि.०७.०९.२०२१ ते १९.०९.२०२१) | -- |
| ५. | प्रवासाचे दिवस | ०२ दिवस | -- |
| ६. | प्रति व्हीसा खर्च | व्हीसा प्राप्त | व्हीसा प्राप्त |
| ७. | कोवीड-१९ तपासणी व RT-PCR | कोवीड तपासणी - रु.६००/-<br>RT-PCR तपासणी $ ४०० X २ = $ ८००<br>$ ८०० X ७८ = ६२,४००/-<br>एकूण रु.६३,०००/- अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो) | रु. १,८९,०००/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च<br>(जो कमी असेल तो) |
| ८. | प्रति टॅक्सी भाडे व निवास खर्च | टॅक्सी भाडे $ ६६० + निवास खर्च $ ३४०० = $ ४०६०<br>$ ४०६० X ७८ = ३,१६,६८०/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो) | रु. ९,५०,०४०/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च<br>(जो कमी असेल तो) |
| ९. | दैनिक भत्ता खर्च | $ १०० प्रति दिवस<br>(एकूण दिवस ११ + ४=१५)<br>१५ X १०० = $ १५००<br>$ १५०० X ७८ = रु. १,१७,०००/- | रु. ३,५१,०००/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च<br>(जो कमी असेल तो) |
| १० | केंद्र शासनाच्या प्रचलित नियमानुसार कर (अमेरीका मधील) | रु. ६२,४०० + रु.३,१६,६८० = ३,७९,०८०/-<br>रु. ३,७९,०८०/- वर ३.५% = १३,२६८/-<br>रु. १३,२६८/- वर १८% = २,३८८/-<br>एकुण रु. - १५,६५६/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो) | रु. ४६,९६८/-<br>अथवा प्रत्यक्ष खर्च<br>(जो कमी असेल तो) |
| ११. | प्रचलित शासकीय निर्देशानुसार आकस्मीक खर्च (अमेरीका व भारतामधील) | प्रत्यक्ष खर्च | प्रत्यक्ष खर्च |
| | **एकूण खर्च रुपये -** | **रुपये ८,७७,३३६/-** | **रुपये २६,३२,००८/-** |